मालोजीराजे भोसले गढी, वेरूळ, ता. खुलताबाद, जि. छत्रपती संभाजीनगर **या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या ब-१ निविदेस मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक २०२४/प्र.क्र.३५/सां.का.३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय
क्र.स्मारक २०२४/प्र.क्र.३५/ सां.का.३, दिनांक १५.०९.२०२३.
२) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र
क्र.स्मारके/२०२४/८३६, दिनांक २९.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

मालोजीराजे भोसले गढी, वेरूळ, ता. खुलताबाद, जि. छत्रपती संभाजीनगर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या रु.१३,६८,८७,५०७/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामाची निविदा कार्यवाही पूर्ण करुन न्यूनतम निविदेचा प्रस्ताव व त्यानुसार सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव संचालकांनी संदर्भाधीन क्र.२ च्या पत्राव्दारे शासन मान्यतेस सादर केला आहे. सदर न्यूनतम निविदेच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये मालोजीराजे भोसले गढी, वेरूळ, ता. खुलताबाद, जि. छत्रपती संभाजीनगर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाकरीता रु.१०,३७,५१,४३२/- (अक्षरी दहा कोटी सदतीस लक्ष एकावन्न हजार चारशे बत्तीस फक्त) इतक्या रकमेच्या साई कंस्ट्रक्शन, छत्रपती संभाजीनगर यांच्या न्यूनतम निविदेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| **निविदाकाराचे नाव** | साई कंस्ट्रक्शन, छत्रपती संभाजीनगर |
| **अंदाजपत्रकीय रक्कम रुपये** | रु.१३,६८,८७,५०७/- |
| **संचालनालयाचा प्रकल्प खर्च** | रु.१०,०२,९१,३७९/- |
| **निविदाकाराचा अंदाजित प्रकल्प खर्च** | रु.१०,३७,५१,४३२/- |
| **अभिप्राय** | साई कंस्ट्रक्शन, छत्रपती संभाजीनगर यांची निविदा ४.९७% अधिक दराची निविदा आहे. दरवाटाघाटीअंती ३.४५% अधिक दराने काम करण्यास सहमती दर्शवली आहे. ही निविदा प्रथम क्रमांकाची (L-१) निविदा आहे. |

०२. सदर ऐतिहासिक राज्य संरक्षित स्मारकाचे जतन व दुरुस्तीची कामे ही विशिष्ट प्रकारची असून सदर कामे पुरातत्वशास्त्र संकेतानुसार करणे आवश्यक आहे. हे काम करण्यासाठी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सादर केलेल्या न्यूनतम निविदेच्या प्रस्तावास महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ चा भाग पहिला उपविभाग ५ मधील अ.क्र.६ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २२० अन्वये प्रशासकीय विभागांना असलेल्या अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

०४. या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेड्डी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) २२०५ १३०२ २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०५. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ६ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१७४००१३८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D93170255809446885E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 17:48:59 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उपसचिव (सां.का. ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, छत्रपती संभाजीनगर
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल-१, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.